१५. धन्य पुंडलीक भक्त निवडला । अक्षयीं राहिला चंद्रभागीं ॥१॥ भक्त नामदेव अक्षयीं जडला । पायरी तो झाला महाद्वारीं ॥२॥ तुकोबा तो भला देहासुद्धां गेला । वैकुंठीं राहिला अक्षयी तो ॥३॥ ज्ञानोबा सोपान निघती हे भक्त । अक्षयी राहत परब्रह्मीं ॥४॥ बोधराज भला वचनीं गोविला । कीर्तनीं राहिला पांडुरंग ॥५॥ साधुसंत फार येती थोर थोर । उभा निरंतर चोखामेळा ॥६॥ संत साधुजन वंदिती चरण । नरहरी निशिदीन सेवेलागीं ॥७

१६. सिक्का जयाचा आहे थोर । हातीं पताकांचा भार ॥१॥ भजन होय स्थळोस्थळीं । अवघी संत हे मंडळी ॥२॥ वैकुंठींची खूण । रणखांब आहे जाण ॥३॥ खांबासी भेटती जन । शिळेवरी लोळे जाण॥४॥ पापतापही जळाले । संतचरणीं नरहरी लोळे ॥५॥

१७. नाशिवंत देह मनाचा निश्चय । सद्गुरूचे पाय हृदयीं असो ॥१॥ कलीमध्यें फार सद्गुरू हा थोर । नामाचा उच्चार मुखीं असो ॥२॥ भजनाचा गजर नामाचा उच्चार । हृदयीं निरंतर नरहरीचे ॥३॥

१८. नाम हे नगरी वैकूंठ पंढरी । नांदतो श्रीहरी पांडुरंग॥१॥ नरदेहीं जन्मले पंढरीस गेले । दृष्टिभरि पाहिले पांडुरंग ॥२॥ भींव-रेचें स्नान देवाचें दर्शन । पाप हें जळोन जाय तेथें ॥३॥ चरणा-वरी माथा नरहरी ठेविला । हृदयीं बिंबला पांडुरंग ॥४॥

१९. कांहीं उपाय चालेना । कांहीं स्वहित घडेना ॥१॥ कांहीं केलें नाहीं पुण्य । काय जन्मासी येऊन ॥२॥ केली नाहीं कांहीं भक्ती । देहीं नाहीं हो विरक्ती ॥३॥ कांहीं केलें नाहीं तीर्थ । जन्म गेला अवघा व्यर्थ ॥४॥ व्यर्थ प्रपंच हा केला । अवघा सेवटीं वायां गेला ॥५॥ गुरु कृपा होय जरी । नरहरी क्षणांत उद्धरी ॥६॥

२०. पापाचे पर्वत मोठे मोठे झाले । शरीर नासलें अधोगती ॥१॥ जन्मांतरीं केलें अवघें व्यर्थ गेलें । देह हो नासलें क्षणमाजी ॥२॥ जिर्ण अशाश्वत देह नाशिवंत । अवघें सारें व्यर्थ असे देखा ॥३॥ कांहीं नाहीं दान कांहीं नाहीं पुण्य । जन्मासी येऊन व्यर्थ जाय ॥४॥ परोकार कांहीं नाहीं केला देवा । सद्गुरु केशवा हृदयीं ध्यावा ॥५॥ सारामध्यें सार नाम असे थोर । हृदयीं निरंतर नरहरीच्या ॥६॥

२१. पहा दिसतो पदार्थ । अवघा नाशिवंत व्यर्थ ॥ १ ॥ माया बहुरूपी नटली । नवखंडीं प्रगटली ॥ २ ॥ प्रपंच हें माया जाळ । घातलें भ्रांतीचें पडळ ॥ ३ ॥ उमज पडेना हो कांहीं । मस्तक सद्गुरूचें पायीं ॥ ४ ॥ सत्गुरु नाम हें अमृत । नरहरी जपे हृदयांत ॥ ५ ॥

२२. पंढरी नगरीं नांदतो श्रीहरी । गाई वळित्या करी गोपाळपुरीं ॥ १ ॥ गोपाळ मिळाले गोपाळपुर झालें । अक्षयीं राहिले देव तेथें ॥ २ ॥ संध्या जेथें केली संध्यावळी झाली । प्रतिमा ठेविली स्थळोस्थळीं ॥ ३ ॥ चरण ठेविलें पद्मतीर्थ झालें । अक्षयीं राहिलें तेव्हां तेथें ॥ ४ ॥ वेणु वाजवीत चंद्रभागीं आले । वेणुनाथ झालें अखंडित ॥ ५ ॥ पंढरी हें स्थळ वैकुंठ सकळ । साधु हो निर्मळ आहे तेथें ॥ ६ ॥ कोटि लिंग आहे कोरटींत पाहें । पंचक्रोशीं राहे देव सर्व ॥ ७ ॥ व्रत एकादशी करिती नेमेसीं । पापी चंडाळांसी उद्धरती ॥ ८ ॥ पंढरी द्वारका भूमिका निर्मळ । साधु हो दयाळ आहे तेथें ॥ ९ ॥ राम लक्ष्मण सीता सती जाण । हवेलींत पूर्ण अक्षयीं तो ॥ १० ॥ अखंडित वाचा उच्चार नामाचा । सेवक संतांचा नरहरिदास ॥ ११ ॥

२३. पंढपुरचा जाणा विठ्ठल धणी । राणी रुक्मिणी सत्यभाम- ॥१॥ भूमीमध्यें गुप्त कानोपात्रा झाली । उजवे बाजू ठेली लक्ष्मी ते ॥२॥ पुढेंहो प्रतीमा नामदेव पायरी । उभा महाद्वारीं चोखामेळा ॥३॥ पुढें मल्लिकार्जुन महिमा असे फार । लिंग असे थोर महादेवाचें ॥४॥ पुढें भागीरथी मध्यें पुंडलीक । आणीकही तेथें वेणुनाद ॥५॥ आशाढी कार्तिकी साधुसंत येती । गोपाळकाला करिती आनंदानें ॥६॥ देवाचे समोर नरहरी सोनार हृदयीं निरंतर नांव घेतो ॥७॥

२४. पंढरी नगरी दैवत श्रीहरी । जाती वारकरी व्रतनेमें ॥१॥ आषाढी कार्तीकी महापर्वें थोर भजनाचा गजर करिती तेथें ॥२॥ साधुसंत थोर पताकांचा भार । मुखीं तो उच्चार नामामृत ॥३॥ आनंदाचा काला गोपाळकाला केला । हृदयीं बिंबला नरहरी ॥४॥

२५. प्रारब्धाची गति । कदाकाळीं न सोडिती ॥१॥ होणार सोडिना । आलें कपाळीं टळेना ॥२॥ दैवयोगाची गती । जी होणार ती होती ॥३॥ जें जें कर्माचें फळ । तें तें भोगावें सकळ ॥४॥ ज्याचें बीज पेरियेलें । त्याचें त्यास फळ आलें ॥५॥ ज्यानें जैसें आचरिलें । तैसें त्याच्या फळा आलें ॥६॥ मानवाचें कल्पना बळ । देव करीतो सकळ ॥७॥ किल्ली कैसी चालविली । घडमोडी कैसी केली ॥८॥ सत्य सार बुडविलें । अवघें असत्यची झालें ॥९॥ नरहरि ह्मण नाम थोर । नाम साराहूनि सार ॥१०॥

२६. प्रेम शांती दया शरण निर्धारेंसी । बसले उदासी सर्व काळ ॥१॥ काया वाचा मन निवडुनी प्राण । गुह्य ज्ञान पूर्ण सर्व साक्षी ॥२॥ सद्गुरूची कृपा होय जयावरी । तो हा श्रीहरीचा संत झाला ॥३॥ संत साधुजन वंदुनीयां पूर्ण । वाचे नारायण नाम घेतो ॥४॥ नरहरी सोनार ह्मणे हरिचा दास । भावें रात्रंदिवस नाम घेतो ॥५॥

२७ भोळा हा शंकर पुढें नंदीश्वर तेथें मी पामर काय वर्णं ॥१॥ भूषण जयाचें भुवना वेगळें । रुंडमाळा खेळे गळ्यामध्यें ॥२॥ कर्पुरगौर भोळा सांब सदाशिव । भूषण धवल विभूतीचें ॥३॥ माथां जटाभार हातीं तो त्रिशूळ । श्वेत शंख बळें फुंकीतसे ॥४॥ ॥४॥ भांग जो सेवुनी सदां नग्न बैसे । जटेंतूनि वाहे गंगाजळ ॥५॥ गोदडी घालूनी स्मशानीं जो राहे । पंच वक्त्र होय श्रेष्ठ भाग ॥६॥ नाम घेतां ज्याचे पाप ताप जाती । पापी उद्धरती क्षणमात्रें ॥७॥ नरहरी सोनार भक्ति प्रियकर । पार्वती शंकर हृदयीं ध्यातों ॥८॥

२८. शरीराची होय माती । कोणी न येती सांगाती ॥१॥ सारीं अवघीं कामें खोटीं । अंतीं जाणें मसणवटीं ॥२॥ गोत घरें टाकुन सारीं । शेवटीं गांवाचे बाहेरी ॥३॥ स्वजन आणि गनगोत । उपाय नाहीं हो चालत ॥४॥ ऐसें स्वप्नवत असार । नरहरी जोडितसे कर ॥५॥

२९. सकळ धर्माचें कारण । नास्मरण हरिकीर्तन ॥१॥ दया क्षमा समाधान । घ्यावें संतांचें दर्शन ॥२॥ संत संग धरा वेगीं ।

वृत्ति जडो पांडुरंगीं ॥३॥ नरतनु न येयाची बा कदां । भावें भजा संत पदा ॥४॥ भुलूं नका या संसारीं । हरी उच्चारीं उच्चारीं ॥५॥ सर्व जायाचें जायाचें । हरि नाम हेंचि साचें ॥६॥ विठोबा रक्षिल शेवटीं । उभा कर दोन्ही कटीं ॥७॥ नरहरी जाणूनि शेवटीं । संत चरणा घाली मिठी ॥८॥

३०. सूर्य असे गगनीं । परी दिसतो जीवनीं ॥१॥ मेघ असतो अंबरीं । पाणी पडे भूमीवरी ॥२॥ आकाशीं चंद्र तारांगण । बिंब दिसे पाण्यांतून ॥३॥ बिंब पाहातां दर्पणीं । बिंब दिसे हो त्यांतुनी ॥४॥ आत्मा अनुभवीं पाहतां । देह दिसे हो तत्वतां ॥५॥ गुरु कृपा होय पूर्ण । नरहरी लपट निसिदिन ॥६॥

३१. नाम फुकाचें फुकाचें । देवा पंढरिरायाचें ॥१॥ नाम अमृत हें सार । हृदयीं जपा निरंतर ॥२॥ नाम संतांचें माहेर । प्रेम सुखाचें आगर ॥३॥ नाम सर्वांमध्यें सार । नरहरी जपे निरंतर ॥४॥

३२. भस्म उटी रुंडमाळा । हातीं त्रिशुळ नेत्रीं ज्वाळा ॥१॥ गज चर्म व्याघ्रांबर । कंठीं शोभे वासुकी हार ॥२॥ भूतें वेताळ नाचती । हर्षयुक्त रमापती ॥३॥ सर्व सुखाचें आगर । ह्मणे नर-हरी सोनार ॥ ४ ॥

३३. ऊठ बा होय जागा पहा वासुदेवाला । सुदिन उगवला दान आपुले घाला ॥१॥ आणिक हिता गा आला अवाचित फेरा। हे घडी सांपडेना कांहीं दान पुण्य करा ॥२॥ ठेविल्या स्थिर नोहे घर सुकृते भर । भक्तासी भय नाहीं संत संगती घर ॥३॥ संसार सार नोहे माया मृगजळ भासे । क्षणांत भ्रांती याचा काय विश्वास ॥४॥ घे करी टाळ दिंडी होय विठ्ठलाचा दास । सावधान नरहरी झालो चरणीं निजध्यास ॥५॥

३४. सत्य ज्योतिर्लिंग बारा । प्रातःकाळीं स्मरण करा । कोटी कुळें उद्धारा। भव तरा बापहो ॥१॥वाराणशी विश्वनाथ।मोक्षदाता तो समर्थ । पुरवील अंतरीचें आर्त। सोमनाथ सोरटी ॥२॥ ॐकार ममलेश्वर। श्वेतबंध रामेश्वर ।भीमा उगमीं भीमाशंकर।घृष्णेश्वर वे-राळीं ॥३॥ नागनाथ अमृतोदकीं। विश्वजन केलें सुखी । परळी वैज-

नाथ सुखी । सुकृत साचें जन्माचें ॥४॥ त्र्यंबक हा तीर्थराज । पुरवील अंतरीचें काज । त्याही तेजामाजी तेज । महाकाळ उज्जनी ॥५॥ दुजे कैलास भुवन। श्रीशैल्य मल्लकार्जुन । वाचे स्मरतां धन्य धन्य। अनुपम्य क्षेत्र तें ॥६॥ बद्रिकेदार उत्तरें। ज्याचें स्मरणें भव हा तरे । ध्यान धरितां वृत्ति नुरे। निज निश्चळ दासाची॥७॥नरहरी म्हणे जन्मा यावे। शुद्धसत्व प्रेम भावें । वाचे हरी गुण गावें। मालो ळपे सर्वदा ॥८॥

---

# सेना न्हावी.

१. हित व्हावें मानसीं । दवडा दंभ मानसीं ॥१॥ अलभ्य-लाभ येईल हातां । शरण जावें पंढरिनाथा ॥२॥ चित्त शुद्धि करा। न देई दुजियासी थारा ॥३॥ हेंचि शस्त्र निर्वाणीचें । सेनाचें ह्मणे घरा साचें ॥४॥

२. तुम्ही संत दयानिधी । तारी सांभाळा दुर्बुद्धि ॥१॥ तुम्हां आहे शरणागत । तरी ताराया पतित ॥२॥ अधिकार नाहीं । न कळे भक्तिभाव कांहीं ॥३॥ वागवा अभिमान । सेना आहे याती हीन ॥ ४ ॥

३. उदार तुह्मी संत । मायबाप कृपावंत ॥१॥ केवढा केला उपकार । काय वाणूं मी पामर ॥२॥ जडजीवा उद्धार केला । मार्ग सुपंथ दाविला ॥३॥ सेना म्हणे उतराई । होतां न दिसे कांहीं ।४।

४. आजि सोनियाचा दिवस । दृष्टीं देखिलें संतांस ॥१॥ जीवा सुख थोर झालें । माझें माहेर भेटलें ॥२॥ अवघा निरसला शीण । देखतां संतचरण ३ आजि दिवाळी दसरा। सेना ह्मणे आले घरा ४

५. ह्मणविलों विठोबाचा दास । शरण जाईन संतांस ॥ १ ॥ सदा सुकाळ प्रेमाचा । नासे दुष्ट मळ बुद्धीचा ॥२॥ ऐकतां हरीचें कीर्तन । अभक्ता भक्ति लागे जाण ॥३॥ उभा राहे कीर्तनांत । हर्षे डुले पंढरिनाथ ४ सेना ह्मणे हेंचि सुख । नाहीं ब्रह्मयासि देख५

६. सुखें घालीं जन्मासी । हेंचि बरें कीं मानसीं ॥१॥ वारी करीन पंढरीची । जोडी ही माझी साची ॥२॥ हरिदासाची करीन

सेवा । तेणें सुख थोर जीवा ॥ ३ ॥ सेना ह्मणे सर्व संग । केला त्याग यासाठीं ॥४॥

७. समचरण विटेवरी । पाहतां समाधान अंतरीं ॥१॥ चला जाऊं पंढरीसी । भेटूं रखुमाईवरासी ॥२ होती संताचिया भेटी । सांगूं सुखाचिया गोष्टी ॥ ३ ॥ जन्ममरणाची चिंता । सेना ह्मणे नाहीं आतां ॥४॥

८. आह्मां हेंचि अळंकार । कंठीं हार तुळशीचे ॥१॥ नाम घेऊं विठोबाचें । ह्मणवूं डिंगर तयाचे ॥२॥ चित्तीं चाड नाहीं । न धरूं आणिकाची कांहीं ॥३॥ सकळ सुख त्याचे पायीं । मिळे बैसालिया ठायीं ॥४॥ सेना ह्मणे याविण कांहीं । मोक्ष युक्ति चाड नाहीं ५॥

९. आह्मी विष्णूचे दास । न मानूं आणिक देवास ॥१॥ स्तुति आणिकांची करितां । ब्रह्महत्या पडे माथा ॥२॥ तुजविण देव म्हणतां । अवघीं पापें पडो माथां ॥३॥ न करीं पूजा आणि सेवन । सेना ह्मणे तुझी आण ॥४॥

१० प्रेमसुखें कीर्तन । आनंदें गाऊं हरीचे गुण ॥ १ ॥ धरिला वैष्णवाचा संग । नाहीं लाग कळीकाळा ॥ २ ॥ स्वल्प मंत्र ह्याचि जाण । रामकृष्ण नारायण ॥ ३ ॥ वाचे न उच्चारीं कांहीं । याविण आणिक नाहीं ॥ ४ ॥ सेना म्हणे रंगले ठायीं । माझें चित्त तुझे पायीं ॥ ५ ॥

११. जेथें वेदां न कळे पार । पुराणासी अगोचर ॥१॥ तो हा पंढरीराणा । बहू आवडतो मना ॥२॥ सहा शास्त्र शिणलीं । मग मौनाचि राहिलीं ॥ ३ ॥ सेना ह्मणे मायबाप । उभा कटी ठेउनि हात ॥ ४ ॥

१२. विटेवरी उभा । जैसा लावण्याचा गाभा ॥१॥ पायीं ठेउनियां माथा । अवघी वारली चिंता ॥२॥ समाधान चित्ता । डोळा श्रीमुख पाहतां ॥३॥ बहु जन्मीं केला लाग । सेना देखे पांडुरंग ४

१३. करसी खटपटी । पोटासाठीं आटाआटी ॥१॥ नाम घेतां विठोबाचें । काय तुझ्या बाचें वेंचे ॥२॥ धनाचिया आशा । वाउगा फिरसि दाही दिशा ॥३॥ जावें हरिकीर्तना । नावडे तुझ्या मना ॥४॥ सेना ह्मणे ऐशा नरा । जवळूनि दूर करा ॥५॥

१४. धन कोणा कामा आलें । पहा विचारूनि भलें ॥१॥ ऐसें सकळ जाणती । कळोनियां आंधळे होती ॥२॥ स्त्रिया पुत्र बंधु पाही। त्याचा तुझा संबंधु नाहीं ॥३॥ सखा पांडुरंगावीण । सेना ह्मणे दुजा कोण ॥ ४ ॥

१५. सांडोनि कीर्तन । न करीं आणिक साधन ॥१॥ पुरवा आवडीचें आर्त । तुम्हां आलों शरणागत ॥२॥ मुखीं नाम वाहीन टाळी । नाचेन निर्लज्ज राउळीं ॥३॥ सेना ह्मणे नुपेक्षावें । हेंचि मागें जिवें भावें ॥४॥

१६. चित्तीं पाय रूप डोळां । मुखीं नाम वेळोवेळां ॥१॥ हेंचि मागें तुजपाशीं । भाव खरा कीं जाणसी ॥२॥ हें उचित तुमचें । कोड पुरवा बाळकाचें ॥३॥ नको देऊं अंतर । सेना लोळे पायांवर ॥४॥

१७. रामें अहिल्या उद्धरिली । रामें गणिका तारिली ॥१॥ म्हणा राम श्रीराम । भवसिंधु तारक राम ॥२॥ रामें जटायु तारिलें । रामें वानरा उद्धरिलें ॥३॥ ऐसा अयोध्येचा राजा । सेना ह्मणे बाप माझा ॥४॥

१८. चित्त नाहीं हातीं । करूं जातां हरिभक्ति ॥१॥ मज इतुली वासना । भेटी द्यावी नारायणा ॥२॥ कोण जाणे दानधर्म । नव्हे स्वतंत्र केचें कर्म ॥३॥ सेना म्हणे सांगें मात । जेणें माझें होय हित ॥४॥

१९. संताचे पाय मस्तकीं । सरता झालों तिहीं लोकीं ॥१॥ लोळेन चरणावरी । इच्छा फिटेल तोंवरी ॥२॥ नाहीं सेवा केली मूर्ती डोळां म्यां देखिली ॥३॥ कृतकृत्य झाला सेना न्हावी ठेविली पायांवरी डोई ॥४॥

२०. कळेल तैसें गाईन तुज । नाहीं जनासवें काज ॥१॥ स्तुती करीन आवडी । जैसी जीवा वाटे गोडी ॥२॥ नाम गाईन आनंदें । नाचेन आपुलाले छंदें ॥३॥ सेना म्हणे नाहीं । जनासवें काज कांहीं ॥४॥

२१. मुखीं नाम नाहीं । त्याची संगती नको पाहीं ॥१॥ ऐसे

याचे मुखीं माउली । वार घालितां विसरली ॥२॥ जया नावडे संतसंगती । अधम जाणावा निश्चिती ॥३॥ नाम घेतां लाज वाटे । रंभे निर्लज भेटे ॥४॥ जातां हरिकीर्तना । नावडे ज्याच्या मना ॥५॥ सेना म्हणे त्यास । कुलासुद्धां नर्कवास ॥६॥

२२. स्वहित सांगावें भलें । जैसें आपणासि कळे ॥१॥ त्याच्या पुण्या नाहीं पार । होय अगणित उपकार ॥२॥ मोहपाशें बांधिला । होता तोही मुक्त केला ॥३॥ जेणें वाट दाखविली । सेना म्हणे कृपा केली ॥४॥

२३. रामकृष्ण नामें । ऐसीं उच्चारावीं प्रेमें ॥१॥ तेणें काळ दुरी पळे । जाती दोष ते सकळे ॥२॥ ऐसा नामाचा प्रताप । नामें निवारिला ताप ॥३॥ मुखीं रामनाम उच्चारी । सेना म्हणे निरंतरी ॥४।

२४. अन्यायी अन्यायी । किती म्हणोन सांगो काई ॥१॥ तूं तों उदाराचा राणा । क्षमा करी नारायणा ॥२॥ काम क्रोध लोभ मोहो । नाडिलों याचेनि पहाहो ॥ ३ ॥ नावडे संतसंगतीं । नाहीं केली हरिभक्ती ॥४॥ निंदा केली भाविकांची । चित्तीं आस धनाची ॥५॥ सेना पायाचा पुतळा । तुज शरण जी दयाळा ॥६॥

२५. ब्रह्मादिक पडती पायां । जें शरण पंढरीराया ॥१॥ मोक्ष मुक्ती लोटांगणीं । उभ्या तिष्ठति आंगणी ॥२॥ सूर्यसुत शरणागत । येउनि चरणीं लागत ॥३॥ काया मनें वाचा । सेना शरण विठोबाचा ॥४॥

२६. कंठीं ठेउनियां कर । रूप पाहिलें मनोहर ॥१॥ तेणें समाधान चित्ता । पायीं ठेविला माथा ॥ २ ॥ वाहो टाळी गातो गीत । सुखें नाचे राउळांत ॥३॥ सेना म्हणे नामा पुढें । तुच्छ सकळ बापुडें ॥४॥

२७. तूं जीवींचें जाणसी । सुखें बोलावें मानसीं ॥१॥ आतां भाकितो करुणा । नको मोकलूं नारायणा ॥२॥ आपुलें केलें न चले कांहीं । साधन वाउगें पाहीं ॥३॥ सेना म्हणे आशा कांहीं । नाहीं देहाची पाहीं ॥४॥

२८. बुडतो भवसागरीं । मज काढीं बा मुरारी ॥१॥ आतां न यावीं भार कांहीं । माझी पाही माऊली ॥२॥ करीं जतन क्रीडा-वळी । वामाविशी तें सांभाळीं ॥३॥ मी महादोषी चंडाळ । सेना म्हणे तूं दयाळ ॥४॥

२९. मायबाप कृपावंत । तुम्ही दयाळू संत ॥१॥ घातला भार तुमच्या माथा । आवडे तें करा आतां ॥२॥ चिंतुनि आलों पायांपाशीं । न धरी वेगळें मशी ॥३॥ सेना म्हणे पायीं मिठी । घातली न करा हिंपुटी ॥४॥

३०. आतां ऐसें करींगा देवा । तुझी घडो पाय सेवा ॥१॥ मनामाजीं दुर्बुद्धी । न यावी साउलिये कधीं ॥२॥ चित्तीं भाव जो धरिला । सिद्धी न्यावाजी विठ्ठला ॥३॥ सेना म्हणे याविण कांहीं । लाभ दुसरा नाहीं ॥४॥

३१. मोक्ष आणि मुक्ति । हे तों तुम्हासी आवडती ॥१॥ एका नामावांचून कांहीं । नसे आवडी आम्हां पाहीं ॥२॥ तुम्ही करावा जतन । तुमचा आहे ठेवा राखून ॥३॥ सेना म्हणे देईं भेटी कृपावंता जगजेठी ॥४॥

३२. शरण जाऊं कोणासी । तुजविण ऋषीकेशी ॥१॥ पाहतां नाहीं त्रिभुवनीं । दुजा तुज ऐसा कोणी २ पाहिली शोधुनी । वेदशास्त्र पुराणीं ॥३॥ सेना म्हणे पंढरिराया । शरण सांभाळी सखया ॥४॥

३३. मानिसी देहाचा भरंसा । केला जाईल नकळे कैसा ॥१॥ सार्थक करा हो कांहीं । जेणें हरी जोडे पायीं ॥२॥ धनसंपत्ति पाही। हीं तों राहील ठायीं ॥३॥ शरण रिघा पंढरिराया । सेना न्हावी लागे पायां ॥४॥

३४. वाट धरितां पंढरीची । चिंता हरे संसाराची ॥१॥ ऐसें कोठें नसे पायीं । धुंडितां ब्रम्हांड पाही ॥२॥ पाहिलीं शोधुनी । तीर्थें आणि देवस्थानीं ॥३॥ मोक्ष मुक्ती पाही । सेना म्हणे लागा पायीं ॥४॥

३५. येथें सुखाचिये राशी । पार नाहीं त्या भाग्यासी १ सुख

झालें आलिंगनें। कांती निवाली दर्शनें ॥२॥ उपकार उत्तीर्णता। सेना म्हणे नाहीं आतां ॥३॥

३६. करीतां योगयाग। न भेटेची पांडुरंग ॥१॥ एका भावा-वांचोनि कांहीं। देव जोडे ऐसा नाहीं ॥२॥ धुम्रपानादि साधन। करितां व्यर्थ होय शीण ॥३॥ करितां साधनें शिणलीं। सेना म्हणे वांया गेलीं ॥४॥

३७. तेचि एक संत जाणा। आवडती नारायणा ॥१॥ पांडु-रंगावांचोनि कांहीं। न जाणे दुसरें पाहीं ॥२॥ मुखीं नाम अमृत-वाणी। धाले मनीं डुलती ॥३॥ सेना म्हणे पायीं माथा। त्यांच्या ठेविला आतां ॥४॥

३८. वाचे म्हणतां निवृत्ति। अवघी निसरली भ्रांति ॥ १ ॥ हें तों माझ्या अनुभवा। प्रत्यया आलें जीवा ॥ २ ॥ गुंतलों होतो मोह आशा। स्मरतां पावलों नाशा ॥ ३ ॥ ऐसा अनुभव नामाचा। सेना न्हावी स्मरे वाचा ॥ ४ ॥

३९. अगा पंढरीनाथा। शरण आलों कृपावंता ॥ १ ॥ याचा धरीं अभिमान। सत्य करावें वचन ॥ २ ॥ गीता भागवतीं। स्वयें बोले रमापती ॥ ३ ॥ ह्मणती दिनानाथ। हेंचि सांभाळीं कीं व्रत ॥ ४ ॥ मोकलितां दुरी। सेना न ठेविची उरी ॥ ५ ॥

४० उतलों पार। संसारासिंधु हा दुस्तर ॥ १ ॥ कृपा केली पांडुरंगें। सर्व निवालीं अंगें ॥ २ ॥ सुख संतोषा पडे मिठी। आवडी पोटीं होती तें ॥ ३ ॥ उपाधी वेगळा। सेना राहिला निराळा ॥ ४ ॥

४१ माझा केला अंगिकार। काय जाणे मी पामर ॥ १ ॥ देंव दीनाचा दयाळा। शरणागता पाळी लळा ॥ २ ॥ प्रल्हादा कारण। प्रगटला नारायण ॥ ३ ॥ मिराबाई साठीं। केवढी केली आटाआटी ॥ ४ ॥ शरण रिघा पंढरिराया। सेना न्हावी लागे पाया ॥ ५ ॥

४२ बैसोनि कीर्तनांत। गोष्टी सांगतो निश्चित ॥ १ ॥ दुष्ट अधम तो खरा। येथुनियां दूर करा ॥ २ ॥ तमाखू ओढुनि

सोडी धूर । दुष्टबुद्धि दुराचार ॥ ३ ॥ पान खाय कीर्तनांत । रुधिर विटाळशीचें पीत ॥ ४ ॥ त्याची संगती जयास । सेना ह्मणे नर्कवास ॥ ५ ॥

४३ हाचि माझा शकून । हृदयीं देवाचें चिंतन ॥ १ ॥ होईल तैसें हो आतां । काय वाहूं याची चिंता ॥ २ ॥ पडियेली गांठी । याचा धाक वाहे पोटीं ॥ ३ ॥ सेना म्हणे हीनपणें । देवा काय माझें जिणें ॥ ४ ॥

४४ नलगे योग तप । करणें साटोप आम्हासी ॥ १ ॥ सोपें साधन आमुचें । नाम गाऊं विठोबाचें ॥ २ ॥ जो नातुडे धूम्रपानीं । राहे संपुष्टीं येऊनि ॥ ३ ॥ जया नाहीं रूप । आह्मां कीर्तनीं समीप ॥ ४ ॥ सेना म्हणे लाडिवाळें । जाणों हरीसी निर्मळ ॥ ५ ॥

४५ म्हणा हरी हरी । अवघे सकळ नरनारी ॥ १ ॥ येणें तुटेल बंधन । भाग निवारील शीण ॥ २ ॥ प्रेमें घ्यारे मुखीं नाम । हरे सकळही श्रम ॥ ३ ॥ सेना म्हणे चित्तीं धरा । बळकट रखुमाईच्या वरा ॥ ४ ॥

४६ लेकुराची आळी मायबापापुढें । पुरवी लाडें कोडें लळे त्याचे ॥ १ ॥ करावा सांभाळ सर्वस्वी गा आतां । कांहो अव्हेरितां जवळीचा ॥ २ ॥ आम्हांवरी चाले सत्ता आणिकांची । थोरीव तुमची काय मग ॥ ३ ॥ आला सेना न्हावी पायांपे जवळी । आतां टाळाटाळी नका करूं ॥ ४ ॥

४७ योगियाचा राजा कैलासवासी गे माये । गाती नारद तुंबर पुढें बसवा आहे ॥ १ ॥ गळां रुंडमाळा वासुकीचें भूषण । गजचर्म पांघुरला अंगीं भस्माचें लेपन ॥ २ ॥ वाम अंगीं गिरिजा देवी जटा गंगा वाहे । भोंवतें गण गंधर्व जोडोनि पाणि उभे राहे ॥ ३ ॥ सेना म्हणे जेणें भाळीं चंद्र धरियेला । नमस्कार माझा तया आदिनाथाला ॥ ४ ॥

४८ कशासाठीं करितां खटपट । तप तीर्थ व्रतें आचाट ॥ १ ॥ नलगे शोधावें गिरिकानन । भावें रिघा विठ्ठला शरण ॥ २ ॥

विभांडक शृंगी तपस्वी आगळा । क्षण न लागतां रंभेनें नागविला ॥ ३ ॥ जाणोनि सेना निवांत बैसला । केशवराजा शरण रिघाला ॥ ४ ॥

४९ जातां पंढरीसी सुख वाटे जीवा । आनंदें केशवा भेटतांचि ॥ १ ॥ या सुखाची उपमा नाहीं त्रिभुवनीं । पाहिलीं शोधोनी अवघीं तीर्थें ॥ २ ॥ ऐसा नामघोष ऐसे पताकाचे भार । ऐसे वैष्णव डिंगर दावा कोठें ॥ ३ ॥ ऐसी चंद्रभागा ऐसा पुंडलीक । ऐसा वेणुनादीं काला दावा ॥ ४ ॥ ऐसा विटेवरी उभा कटेवरी कर । ऐसें पाहतां निर्धार नाहीं कोठें ॥ ५ ॥ सेना म्हणे खूण सांगितली संतीं । यापरती विश्रांती न मिळे जीवा ॥ ६ ॥

५० विटेवरी उभा नीट देखिलागे माये। निवाली कांती हरपला देहभाव ॥ १ ॥ तें रूप पाहतां मन माझें वेधलें। नुठेचि कांहीं केलें तेथुनि गे माये ॥ २ ॥ अवघें अवघियाचा विसर पडियेला । पाहतां चरणाला श्रीविठोबाच्या ॥ ३ ॥ सेना ह्मणे चला जाऊं पंढरीसी । जिवलग विठ्ठलासी भेटावया ॥४ ॥

५१ विटेवरी उभा नीट कटावरी कर । वाट पाहे निरंतर भक्ताची गे माये ॥ १ ॥ श्रीमुगुट रत्नाचा ढाळ देती कुंडलांचा । तुरा खोंविला मोत्याचा तो गे माये ॥ २ ॥ कंठीं शोभे एकावळी तोडर गर्जे भूमंडळीं । भक्तजनाची माउली तो गे माये ॥३ ॥ सोनसळा पतांबर ब्रीद वागवी मनोहर । सेना वंदी निरंतर तो गे माये ॥ ४ ॥

५२. शिणसी भरोवरी । वार्या कासया येरझारी ॥१॥ वेद मंथोनियां । नाम काढिलें लवलाह्या ॥२॥ आणिक साधन । नाहीं नाहीं नामाविण ॥३॥ सेना ह्मणे केला नेम । वस्ती राहे पुरुषोत्तम ॥४

५३. देहुडे ठाण सकुमार गोजिरें । कल्पद्रुमातळीं उभा देखिलारे ॥१॥ मनीं वेध लागला त्या गोपाळाचा । जो जिवलग गोपगोपिकेचा ॥२॥ जी सावळी सगुण घनानंद मूर्ती । पाहतां वेधली माझी चित्तवृत्ती ॥३॥ जो उभाचि राहिला व्यापुनी सकळ । भेंटिलागीं सेना न्हावी उतावीळ ॥४॥

५४. जो हा दुर्लभ योगिया जनासी । उभाचि देखिला पुंडलीकापासी ॥१॥ हारपलें दुजेपण फिटला संदेह । निमाली वासना गेला देहभाव ॥२॥ विटेवरी उभा पंढरीचा राणा । सेना ह्मणे बहु आवतो मना ॥३॥

५५. तरी का माझा केला अंगिकार । आतां विचार करिसी वाया ॥१॥ तुज मी ठाऊक होतों अन्याई । हा खरा तेव्हां कां विचार केला नाहीं ॥२॥ आमुचें तें आम्ही केलेंसें जतन । अंतर तुम्हाकूण न पडावा ॥३॥ समर्थाचें असे वचन प्रमाण । शरणागता जाण जतन जीवीं ॥४॥ तुझा ह्मणविलों सांभाळीं जी आतां । न घे अपेश माथा सेना ह्मणे ॥५॥

५६. अन्यायी अपराधी लाडिवाळ संताचा । तेथें कळिकाचा रीघ नाहीं १ समार्थाचें बाळ समर्थचि जाण । वागवी अभिमान म्हणतां त्याचें ॥२॥ अन्यायाच्या राशी उदंड केल्या जरी । तरी क्षमा करीं मायबापा ॥३॥ कल्पतरू छाया बैसला सेना न्हावी । दया ते वागवी बहु पोटीं ॥४॥

५७. ठेविला पाय माथा संतजनीं । तिन्ही लोकीं जाण सरता केला ॥१॥ घालीन लोटांगण वंदीन पाय माथा । पुरेल माझी इच्छा धणीवरी ॥२॥ सेना म्हणे धन्य धन्य झालों देवा । न करितां सेवा भेटी दिली ॥३॥

५८. सिद्ध ब्रह्मज्ञान बोलतां नोहे वाचें । शांतवन क्रोधाचें झालें नाहीं ॥१॥ पाल्हाळ लटिका करणें तो काय । शरण पंढरीराया गेला नाहीं ॥२॥ जंव नाहीं गेली अज्ञानाची भ्रांती । जंव नाहीं विरक्ती बाणली आंगीं ॥३॥ जीवाची तळमळ राहिली सकळ । मग ब्रम्हज्ञान कळे सेना म्हणे ॥४॥

५९. घरासी आले संत देखोनियां । म्हणे यासी खावया कोठुनि घालूं ॥१॥ ऐसा हा निर्धारी दुष्ट दुराचारी । जन्मोनिया झाला भूमि भारी ॥२॥ दासीचें आर्जव करोनि भोजन । घाली समाधान करीं तीचें ॥३॥ आणि आवडीनें करी तिची सेवा । म्हणे सुख घर माझ्या ॥४॥ संतांनीं पाणी मागतां म्हणे काय । मों-

डले कीं पाय जाय आपणी ॥५॥ सेना ह्मणे खरें गाढवा वेण्यासी कुंभपाक वस्तीसी केला आहे ॥६॥

६०. येऊनि गर्भासी मेलों उपवासी । नाहीं सखी ऐसी भेटली कोणी ॥१॥ देह जाणे अनित्य करावें स्वहित । मोहा पासुनि निश्चित सोडविल ॥२॥ न होय अनारिसा पाळी तोंडीच्या घासा । सोडवी ना ऐसा परी देखों ॥३॥ वाटलों मीपणें धनमान कांहीं । सेना म्हणे नाहीं लाभ अलाभ ॥४॥

६१. तुज ऐसें वाटे देह व्यर्थ जावा । द्यूतकर्म खेळावा सारीपाट ॥ १ ॥ मग नाहीं नाम निजल्या जागा राम । जन्मोनि अधम दुःख पावे ॥ २ ॥ दासीगमनीं धीट विषयीं लंपट । जावया वाट अधोगती ॥ ३ ॥ नर्का जावयासी धरसील चाड । तरी निंदा गोड वैष्णवाची ॥ ४ ॥ सेना ह्मणे नामाचें लावीं कांरे पिसें । जन्मल्या सायासें व्यर्थ जासी ॥ ५ ॥

६३. ऐकिलें मागें तारिले बहुता । धांवसी कीं आतां नाम घेतां ॥ १ ॥ बरव्यापरी मज ऐसें कळों आलें । म्हणउनी विठ्ठले करीं धावा ॥ २ ॥ पडिला विसरू माझा तुजलागीं । आतां पांडुरंगीं करणें काय ॥ ३ ॥ तुजलागि माझी नयेचि करुणा । धरिलें कीं जाण दुरी मज ॥ ४ ॥ सेना ह्मणे आतां सांभाळी नारायणा । जाऊं पाहे प्राण तुजसाठीं ॥ ५ ॥

६४. पुत्राचिया ओढी बाप करी जोडी । वाळवुनि कुरवंडी आपणा करी ॥ १ ॥ मिरासीचा धनी करुनि ठेविला । भार तो वाहिला कडिये खांदीं ॥ २ ॥ घाली अलंकार कौतुक डोळा पाहे । ठेवा दावी काय आहे तोची ॥ ३ ॥ दुजियांनीं कोणी गांजिता तयासी । उदार जीवासी सेना ह्मणे ॥ ४ ॥

६५. आम्हां एकविध भाविकांची जाती । न जाणे निश्चिती दुजें कांहीं ॥ १ ॥ खुण जाणे चित्तीं क्षोभ उपजेना । कळवळुनि स्तना लावी पाळी ॥ २ ॥ अवघे होऊं येतें तुज वाटे चित्तें । उपासने परतें नावडे कांहीं ॥३ ॥ डोळा मूख पाहूं मुखीं नाम गाऊं । । सेना ह्मणे पाहूं जळीं स्थळीं ॥ ४

८६. असतां वैकुंठासी । काय सांगे ऋषीकेशी । जाऊनि मृत्युलोकासी । जन भक्तिसी लावीं कां ॥१॥ आज्ञा वंदुनीया शिरीं । जन्मलों न्हावीयाचे उदरीं । वाचे नाम निरंतरी । रामकृष्ण गोविंद ॥२॥ कलियुगामाजि जाण । सोपें हेंचि साधन । रामकृष्ण नारायण । ऐसें पुरुषोत्तम सांगत ॥३॥ सेना म्हणे देवाधिदेवा । आह्मीं करावी तुझी सेवा । हेंचि मागतों केशवा । नित्य रहावें मजपाशीं ॥४॥

१०. जे ह्मणविती न्हावियाचे वंशी । तेणें पाळावें स्वधर्मासी ॥१॥ येर अवघे चटकींचे । नव्हे न्हावियाचे वंशींचे ॥२॥ शास्त्रें नेम नेमियला । सांडोनि अनाचार केला ॥३॥ जन्मलों ज्या वंशांत । धंदा दोन प्रहर नेमस्त ॥४॥ सत्य पाळारे स्वधर्मासी । सेना ह्मणे आज्ञा ऐसी ॥५॥

८७ न्हावीयाचे वंशीं । जन्म दिला ऋषीकेशी । प्रतिपाळावें धर्मासी । व्यवहारासी न सांडीं ॥१॥ ऐका स्वधर्मविचार । धंदा करी दोन प्रहर । सांगितलें साचार । पुराणांतरीं ऐसें हें ॥२॥ करूनियां स्नान । मुखीं जपे नारायण । मागुती न जाण । शिवूं नये धोकटी ॥३॥ ऐसें जे कां न मानिती । ते जातील नरकाप्रती । सकळ पूर्वज बुडविती । शास्त्रसंमती ऐसी हे ॥४॥ शिरीं पाळावें आज्ञेसी । शरण जावें विठोबासी । सेना ह्मणे त्यासी । ऋषीकेशी सांभाळीं ॥५॥

८९. करितों विनवणी । हात जोडूनियां दोन्हीं ॥ १ ॥ हेंचि द्यावें मज दान । करा हरीचें चिंतन ॥ २ ॥ जातों सांगूनियां मात । पांडुरंग बोलावित ॥ ३ ॥ सोडा द्वादशी पारणें । सुखें करावें कीर्तन ॥ ४ ॥ दिवस मध्यान्हीं आला । सेना वैकुंठासी गेला ॥ ५ ॥

९०. आलिंगन भेटी । मग चरणीं घाली मिठी ॥१॥ ऐसा माझा भोळा भाव । पंढरिराव जाणता ॥२॥ घेतलें हिरोनी । सीणभाग चक्रपाणी ॥३॥ सेना म्हणे मायबापें । द्यावें भातें हें आतां ॥४॥

९१. नाहीं सुख त्रिभुवनीं । म्हणुनि मनीं धरिलें ॥१॥ पायीं ठेवियला भाळ । कंठीं माळ नामाची ॥२॥ पावलों विश्रांती । सेना म्हणे कमळापती ॥३॥

९२. ऐसी आवडी आहे जीवा । कैं पाहीन केशवा ॥१॥ माझी पुरवा वासना । सिद्धी न्यावी नारायणा ॥२॥ नलगे वित्त धन मुखीं नाम नारायण ॥३॥ सेना म्हणे कमळापती । हेंचि द्यावें पुढता पुढती ॥४॥

९३. संतीं सांगितलें । तेंचि तुम्हां निवेदिलें ॥१॥ मीतों सांगतसें निकें ॥२॥ येतील रागें येवों सुखें ॥३॥ निरोप सांगतां । कासया वागवावी चिंता ॥३॥ सेना आहे शरणागत । विठोबा रायाचा दूत ॥४॥

९४. करा हाचि विचार । तरा भवसिंधु पार ॥१॥ धरा संताची संगती । मुखीं नाम अहो रातीं ॥२॥ अजामीळ पापराशी । पार पावाविलें त्यासी ॥३॥ नका धुरें भरूं डोळा । सेना सांगे वेळोवेळां ॥४॥

९५. करितां परोपकार । त्याच्या पुण्या नाहीं पार ॥१॥ करिता परपीडा । त्याच्या पाया नाहीं जोडा ॥२॥ आपुलें परावें समान । दुजा वरफडे देखून ॥३॥ आवडे जगा जें कांहीं । तैसें पाहीं करावें ४ उघडा घात आणि हित । सेना ह्मणे आहे निश्चित ५

९६. शरणागता आहे वैभवाचीं धनी । सत्य भावें मानी अर्पिलें तें ॥१॥ आपणा वेगळें नेदी उरो कांहीं । भावेंचि दावी आपणामाजीं ॥ २ ॥ दशा आली आंगा नेणें जाणें कांहीं । आपणचि होय इच्छा त्याची ॥३॥ धाकुट्यासी माता करी स्तनपान । सेना म्हणे जिणें बरें हेंचि ॥ ४ ॥

९७. स्वभावें गाईन । आवडीनें तुझें नाम ॥१॥ हाचि माझा निर्धार । न करी आणिक विचार ॥२॥ लोळेन तुझिये आंगणीं । निर्लज्ज होउनि मनीं ॥३॥ रंगीं नाचेन मना ऐसें । पाहिन श्रीमुख सरिसें ॥४॥ सेना म्हणे संकल्प जीवा । हाचि निर्धार देवा ५

९८. मान करावा खंडण । दुर्जनाचा सुखें करून ॥१॥ लाथा हाणुनि घाला दुरी । निंदकासीं झडकरी ॥२॥ त्याचा जाणावा विटाळ । लोकां पिडीतो चांडाळ ॥३॥ त्याची संगती जयास । सेना ह्मणे नर्कवास ॥४॥

९९. हंबरोनि येती । वत्सा धेनु पान्हा देती ॥१॥ तुह्मी करा-वा सांभाळ । माझा अवघा सकळ ॥२॥ विसरली भूकतान । तुमचें देखिल्या चरण ॥३॥ सेना म्हणे प्रेम भातुकें । यावें आतां हें कौतुकें ॥४॥

१००. तुम्ही करा कृपादान । येइन धाऊन पायापें ॥१॥ घेइन संतांची भेटी । सांगेन सुखाचिये गोष्टी ॥२॥ जैसें मातेपाशीं बाळ । सांगे जीवींचें सकळ ॥३॥ सेना म्हणे हरे ताप । मायबाप देखुनी॥४

१०१. आजि फळा आलें पूण्य गेले भेदोनि गगन ॥१॥ संत झालेति कृपाळ । माझा केलाजी संभाळ ॥२॥ संचित वोळलें । तुमचीं देखिलीं पाउलें ॥३॥ सेना म्हणे नेणे । कृपा केली नारायणें॥४

१०२. उच्चारीत कोडे । नाम अबद्ध वांकुडें ॥१॥ मना आवडे त्यावेळीं । भलत्या काळीं उच्चारीं ॥२॥ कैसें नाम ठेवूं आतां । कोठें न मिळे पाहतां ॥३॥ सेना म्हणे आनंदें धालो । सुख लाधलों परिपूर्ण ॥४॥

१०३. असाल तेथें नामाचें चिंतन । याहुनि साधन आणिक नाहीं ॥ १ ॥ सोडवील माझा भक्ताचा कैवारी । प्रतिज्ञा निर्धारी केली आह्मी ॥ २ ॥ गुण दोष याती न विचारी कांहीं । धांवे लव-लाही भक्तकाजा ॥ ३ ॥ अवघे काळीं वाचें ह्मणा नारायण । सेना ह्मणे क्षण जाऊं न द्या ॥ ४ ॥

१०४. अंगिकार केला । भार चालवी विठ्ठला ॥ १ ॥ संतीं सां-गितलें । तें म्यां हृदईं धरिलें ॥ २ ॥ तारिला अजामिळ । महा पापी कीं चांडाळ ॥ ३ ॥ पतितपावन । करी नाम हें जतन ॥४ ॥ वाच्यवी अभिमान । सेना न्हावी यातिहीन ॥ ५ ॥

१०५. अंतरींचें पुरे काम । घेतां नाम विठोबाचें ॥ १ ॥ नाम साराचेंही सार । शरणागत यमकिंकर ॥ २ ॥ पहिले वेदांत । नि-श्चय केला निगमांत ॥ ३ ॥ सेना म्हणे न वेंचा कांहीं । लाभ नाहीं या ऐसा ॥ ४ ॥

१०६. ऐसी आवडी आहे माझ्या जीवा । तुजसि केशवा निवे-दिलें ॥ १ ॥ पांडुरंगा ऐसें वाटतसे जीवा । करिन संतसेवा अह-

निशीं ॥ २ ॥ नलगे वित्त गोत वैकुंठीं राहणें । सायुज्य सदनीं चाड नाहीं ॥ ३ ॥ करुणास्वरें सेना बहात विठ्ठला । हेतू पुरविला आवडीचा ॥ ४ ॥

१०७. करितां योगयाग । सिद्धी न पवेचि सांग ॥ १ ॥ देव एक भावाविण । नाहीं नाहीं व्यर्थ शीण ॥ २ ॥ केल्या तपाचिया राशी । तरि न मिळेचि त्यासी ॥ ३ ॥ करितां धूम्रपान । न भेटे नारायण ॥ ४ ॥ सेना म्हणे नको कांहीं । एका वीण दुजे नाहीं ॥५॥

१०८. करितां देवपूजा । नित्य नेम सारिला वोजा । मग आठविलें अधोक्षजा । ध्यानस्थ बैसलों ॥ १ ॥ दूत आले लवलाही । रायें बोलाविलें पाहीं । कोठें आहे मज दावी । उरी न ठेवी याची कांहीं ॥ २ ॥ जाणुनि संकट श्रीहरी । धोकटी घेतली खांद्यावरी । त्वरें आला राजदरबारीं । देखुनि हरी क्रोध निमाला ॥ ३ ॥ राया सन्मुख बैसून । हातीं दिधलें दर्पण । मुख पाहे विलोकून । मूर्ती दिसे चतुर्भुज ४ हात लाविला मस्तका । वृत्ती हरपली देखा । राव म्हणे प्राणसखा । नित्य भेटे मजलागी ॥ ५ ॥ मग केलें तेलमर्दन । वाटी बिंबला नारायण । विसरला कार्य आठवण । वेधलें मन रूपासी ॥ ६ ॥ भोंवतां पाहे विलोकून । अवघा बिंबला नारायण । तटस्थ पाहती सभाजन । नाहीं भान रायासी ॥ ७ ॥ राव म्हणे हरीसी । तुम्हीं रहावें मजपाशीं । तुजविण न गमे दिवसनिशीं । हरी म्हणे भाकेसि न गुंते मी ॥ ८ ॥ मग प्रधानें काय केलें । राया स्नानासी पाठविलें । रायें होन दिधले । हरीनें ठेविले धोकटींत॥९॥ शुद्ध नाहीं याती । नाहीं केली हरि भक्ति । शिणविला कमळापती । नाहीं विरक्ति बाणली अंगीं ॥ १० ॥ नाहीं अपराधा गणीत । देखोनि होन ब्राह्मणा देत । देवास घाली संकटांत । आण वाहत विठोबाची ॥ ११ ॥ सेना म्हणे ऋषीकेशी । मज कारणें शिणलासी म्हणुनि लागलों चरणासी । संसारासी त्यागिलें ॥ १२ ॥

१०९. करितां नित्य नेम । रायें बोलाविलें जाण ॥१॥ पांडुरंगें कृपा केली । राया उपरती झाली ॥२॥ मुख पाहतां दर्पणीं । आंत दिसे चक्रपाणी ॥३॥ कैसी झाली नवलपरी । वाटीमाजीं दिसे हरी ॥४॥ रखुमादेवीवर । सेना म्हणे मी पामर ॥५॥

११० म्हणवितो दास । तरी सांभाळी ब्रिदास ॥ १ ॥ शुद्ध नाहीं भाव । तूं जाणशी पंढरीराव ॥२॥ केलेंसे जतन । धोकटी आरसाची जाण ॥ ३ ॥ करितो व्यवसाव । माझ्या जातीचा स्वभाव ॥ ४ ॥ सेना करितो विनवणी । हात जोडूनिया दोन्ही ॥ ५ ॥

१११. चिंतन चित्ताला । लावी मनाच्या मनाला ॥ १ ॥ उन्मनी सुखांत । पांडुरंग भेटी देत ॥ २ ॥ ऐसा आहे श्रेष्ठाचार । वेद शास्त्राचा निर्धार ॥ ३ ॥ कवटाळूनि पोटीं । सेना ह्मणे सांगूं गोष्टी ॥ ४ ॥

११२. घेतां नाम विठोबाचें । पर्वत जळती पापाचे ॥ १ ॥ ऐसा नामाचा महिमा । वेद शिणला झाली सीमा ॥ २ ॥ नामें तारिले अपार । महा पापी दुराचार ॥ ३ ॥ वाल्हा कोळी ब्रह्महत्यारी । नामें तारिला निर्धारीं ॥ ४ ॥ सेना बैसला निवांत । विठ्ठल नाम उच्चारीत ॥ ५ ॥

११३ पांडुरंग दास । म्हणती सांभाळी ब्रिदास ॥ १ ॥ नाहीं भाव आंगीं । भूषण मिरावितो जगीं ॥ २ ॥ व्रत आचरण । नाहीं केलें तुझें ध्यान ॥ ३ ॥ स्थिर नाहीं मन । सदा विषयाचें ध्यान ॥ ४ ॥ सेना आहे अपराधी । सांभाळावें कृपानिधी ॥ ५ ॥

११४ स्तुति करूं ऐसा नाहीं अधिकार । शिणला फणिवर वर्णवेना ॥ १ ॥ तेथें मी सरता होईन कैशापरी । वर्णावया हरी कीर्ति तुझी ॥ २ ॥ अठराही भागले सहाही शीणले । चाऱ्हीही राहिले मौन्यची ॥ ३ ॥ रुक्मादेवीवरें अंगिकार केला । निवांत राहिला सेना न्हावी ॥ ४ ॥

११५ वेद वर्णिता शीणला । मग मौन्यची राहिला ॥ १ ॥ तेथें माझी वैखरी । कैसी पूर्ण पावे हरी ॥ २ ॥ नेणती गोरा कीं सांवळा । त्याचि न कळेचि लीळा ॥ ३ ॥ हा सगूण कीं निर्गुण । गुणातीत परिपूर्ण ॥ ४ ॥ माथा ठेऊनि चरणीं । सेना पाहे विलोकुनी ॥ ५ ॥

११६ संत संगतीनें थोर लाभ झाला । मोह निरसला माया-

दिक ॥ १ ॥ घातले बाहेरी काम क्रोध वैरी। बैसला अंतरीं पांडु-रंग ॥ २ ॥ दुजियाचा वारा लागूं नेदी अंगा। ऐसे पांडुरंगा कळों आलें ॥ ३ ॥ संतांनीं सरता केला सेना न्हावी । ब्रम्हादिकां पाहीं नातुडे जो ॥ ४ ॥

११७. नामाचें चिंतन श्रेष्ठ पैं साधन। जातील जळोनि महा-पापें ॥१॥ न लगे धूम्रपान पंचाग्निसाधन । करितां चिंतन हरी भेटे ॥२॥ बैसुनि निवांत करा एकचित्त । आवडी गावें गीत विठोबाचें ३ सकळाहुनि सोपें हेंचीं पैं साधन । सेना म्हणे आण विठोबाची ४

११८. धन्य धन्य दिन । तुमचे झालें दरुषण ॥१॥ आजि भाग्य उदया आलें। तुमचें पाउल देखिलें ॥२॥ पूर्व पुण्य फळा आलें । माझें माहेर भेटलें ॥३॥ सेना म्हणे झाला । धन्य दिवस आजि भला ॥४॥

११९. माझें अंतरींचें । जाणे पांडुरंग साचें ॥१॥ जीवभाव त्याच पायीं । ठेउनि कांहीं न मागों ॥२॥ सुख संत समागम । घेऊं नाम आवडी ॥३॥ सेना म्हणे चुकलों साचे । आणिक वाचे न सेवी ॥४॥

१२०. देई मज जन्म देवा । करीन सेवा आवडी ॥१॥ करीन संतांचें पूजन । मुखीं नाम नारायण ॥२॥ असो भलते ठायीं । सुख दुःखा चाड नाहीं ॥३॥ मोक्ष सायुज्यता । सेना म्हणे नये चित्ता ४

१२१. कांहीं न करी रे मना । चिंती या चरणा विठोबाच्या ॥१॥ ठाव नाहीं कल्पनेसी । राशी सुखाची अमूप ॥२॥ पाहिलें श्रीमुख । नासे दुःख महाताप ॥३॥ होईल विसावा । सेना म्हणे सुख जिवा ॥४॥

१२२. नाम साधनाचें सार । भवसिंधु उतरी पार ॥१॥ तिहीं लोकीं श्रेष्ट । नाम वरिष्ठ सेवी हें ॥२॥ शिवभगानीचा । गुप्त मंत्र आवडीचा ॥३॥ सेना म्हणे इतरांचा । पाड कैचा मग येथें ॥४॥

१२३. फळा आलें पुण्य । गेलें भेदुनी गगन ॥१॥ संत झाले ते कृपाळ । माझा केला जी सांभाळ ॥२॥ संचित ओळलें । तुमचीं देखिलीं पाउलें ॥३॥ सेना म्हणे नेणे । कृपा केली नारा-यणें ॥४॥

१२४ धन्य महाराज पुंडलीक मुनी । वैकुंठींचा सखा आणिला भूतळालागोनी ॥ १ ॥ केला उपकार जग तारिलें सकळ । निरसली भ्रांति माउली स्नेहाळ ॥ २ ॥ आली चंद्रभागा गर्जना करीत । तुझिया भेटीलागीं उतावीळ धांवत ॥ ३ ॥ जोडोनियां पाणी सेना करी विनवणी । ह्मणे धन्य पुंडलीका माथा ठेविला चरणीं ॥ ४ ॥

१२५ उदार तुह्मी संत । मायबाप कृपावंत ॥ १ ॥ केवढा केला उपकार । काय वाणूं मी पामर ॥ २ ॥ जड जीवा उद्धार केला । मार्ग दाखविला सुपंथ ॥ ३ ॥ सेना ह्मणे उतराई । होता कांहीं दिसेना ॥ ४ ॥

१२६. त्रैलोक्य पाळतां । नाहीं उबग तुमच्या चित्ता ॥ १ ॥ तया आमुची चिंता । नसे काय रुक्मिणी कांता ॥ २ ॥ दर्दुर राहे पाषाणांत । तया चारा कोण देत ॥ ३ ॥ पक्षी अजगर । तया पाळी सर्वेश्वर ॥ ४ ॥ सेना म्हणे पाळुनी भार । राहिलों निर्धार उगाची ॥ ५ ॥

१२७. म्हणवितों विठोबाचा दास । शरण जाईन संतास । ॥१॥ सदा सुकाळ प्रेमाचा । नासे मळ दुष्ट बुद्धीचा ॥२॥ ऐकतां हरिचें कीर्तन । अभक्ति भक्ति लागे ज्ञान ॥३॥ उभा राहे कीर्तनांत । हर्षें डोले पुंढरीनाथ ॥४॥ सेना म्हणे हें सुख । नाहीं ब्रह्मयासी देख ॥५॥

१२८. आम्ही वारीक वारीक । करूं हजामत बारीक ॥१॥ विवेक दर्पण आयना दाऊं । वैराग्य चिमटा हालऊं ॥२॥ उदक शांती डोई घोळूं । अहंकाराची शेंडी पिळूं ॥३॥ भावार्थाच्या बगला झाडूं । काम क्रोध नखें काढूं ॥४॥ चौ वर्णा देऊनी हात । सेना राहिला निवांत ॥५॥

१२९. स्वर्गींचे अमर मागताती देवा । संताची सेवा करावया ॥१॥ पंढरीचें सुख देखोनी नयनीं । करिती विनवणी जोडुनी हात ॥२॥ चारी मुक्ति तेथें हिंडती दीनरूप । येऊं नेदी समीप कोणी तया ॥३॥ धिक्कारूनी तया घालिती बाहेरी । मागुती पायावरी

लोळताती ॥४॥ वैष्णव शरण येती काकुळती । आमुची ती गती काय सांगा ॥५॥ या सुखाचा थेंबुटा नमी ब्रह्मादीकां । तेथें सेना देखा सरता झाला ॥६॥

१३०. सुखें घालीं जन्मासी । हेंचि बरें कीं मानसीं ॥१॥ वारी करीन पंढरीची । जोडी साची ही माझी ॥२॥ हरिदासाची करीन सेवा । तेणें सुख फार जिवा ॥३॥ सेना ह्मणे सर्व संग । केला त्याग यासाठीं ॥४॥

१३१. ही माझी मिरासी । पाडुरंग पायापासी ॥१॥ करीन आपुलें जतन । वागवितों अभिमान ॥२॥ जुनाट जुगादीचें । वडिलें साधियेलें साचें ॥३॥ सेना ह्मणे कमळपती । पुरातन हे माझी वृत्ती ॥४॥

१३२. स्वहिताकारणें सांगतसें तुज । अंतरींचें गुज होतें कांहीं ॥१॥ करा हरी भजन तराल भवसागर । उतरील पैलपार पांडुरंग ॥२॥ कृपा नारायणें केली मजवरी । तुम्हालागीं हरी विसंबेना॥३॥ सेना सांगूनिया जातो वैकुंठासी । तिथि ते द्वादशी श्रावण मास ४

१३३. माझें झालें स्वहित । तुह्मां सांगतों निश्चित ॥१॥ करा हरीचें चिंतन । गावें उत्तम हें गुण ॥२॥ श्रावण वद्य द्वादशी । सेना समाप्त त्या दिवशीं ॥३॥

## त्रिंबकमाहात्म्य

१३४. पुण्यभूमी गंगातीरीं। धरी अवतार त्रिपुरारी । नाम त्रिंबक निर्धारी । मार्गे ब्रह्मगिरी शोभत ॥ १ ॥ पार्वतीसी सांगे कैलासराणा । येथें नांदेल निवृत्ती निधान । त्याचेनि ठाव हा पुण्यपावन । जीवा उद्धरण म्हणतां निवृत्ति ॥ २ ॥ जुनाट जुगादीचें गुप्त ठेविलें । तेंचि निवृत्तिनाथा दीधलें । ज्ञानदेवें प्रगट केलें । जगा दाविलें निधान ॥ ३ ॥ या भूमिकेचें वर्णन । करूं न शके चतुरानन । कैलासाहून पुण्य पावन । तुजला पूर्ण सांगितलें ॥४॥ तो हा निवृत्तीनाथ निर्धारी । स्मरतां तरती नरनारी । सेना म्हणे श्रीशंकरीं। ऐसें निर्धारीं सांगितलें ॥ ५ ॥

१३५ शिवाचा आवतार । स्वामी निवृत्ति दातार ॥१॥ तया माझा नमस्कार । वारंवार निरंतर ॥ २ ॥ धन्य नांदे कैलास

राणा । मागें गंगा ओघ जाणा ॥ ३ ॥ सेना घाली सोटांगण । वंदी निवृत्तीचे चरण ॥ ४ ॥

१३६. निवृत्ति निवृत्ति । ह्मणतां पाप नुरेची ॥१॥ जप करितां त्रिअक्षरीं । मुक्ती लोळे चरणावरी ॥२॥ ध्यान धरितां निवृत्ति । आनंदमय राहे वृत्ति ॥३॥ सेना ह्मणे चित्तीं धरा । स्मरता चुके येरझारा ॥४॥

१३७ सिद्धांमाजि अग्रगणी । तो हा भोळा शूळपाणी ॥ १ ॥ धन्य धन्य त्रिंबक राजा । तया नमस्कार माझा ॥ २ ॥ जटीं गंगा वाहे । तो हा त्रिगुणात्मक पाहे ॥ ३ ॥ भोंवता वेढा ब्रम्हगिरी । मध्यें शोभे त्रिपुरारी ॥ ४ ॥ सेना घाली लोटांगण उभा राहे कर जोडून ॥ ५ ॥

१३८. धन्य धन्य निवृत्तिराया । शरण आलों तुझिया पायां १ नको पाहूं दुसरें आतां । गुण दोषाची वारता ॥२॥ नाहीं माझा अधिकार । यातीहीन मी पामर ॥३॥ अपराधाचा केलों । सेना म्हणे काय बोलों ॥४॥

## आळंदीमाहात्म्य

१३९. पुण्यभूमी आळंकावती । प्रत्यक्ष नांदे कैलासपती । आणि सिद्ध साधकां वस्ती । ब्रम्हा अमरपती आदिकरुनी ॥ १ ॥ ऐका अळंकापुरीची मात । स्वयें वर्णीत श्रीभगवंत । उपमेसि न पुरे निश्चित । वैकुंठ आदिकरोनी ॥ २ ॥ येथें तिन्ही मूर्ति अवतार । धरुनि करिती जगाचा उद्धार । मूळ आदि माया साचार । धरी अवतार मुक्ताबाई ॥ ३ ॥ या चौघाचे स्मरणीं । महापापा होय धुणी । येऊनि मुक्ती लागती चरणीं । ऐसें चक्रपाणी सांगत ॥ ४ ॥ नामया सांगे जगज्जीवन । या भूमीचें न करावें वर्णन । सेना घाली लोटांगण । वंदी चरण ज्ञानदेवाचें ॥ ५ ॥

१४० धन्य अलंकापूर धन्य सिद्धेश्वर । धन्य ते तरुवर पशु पक्षी ॥ १ ॥ धन्य इंद्रायणी धन्य भागीरथी । तेथें स्नान जे करिती धन्य जन्म ॥ २ ॥ धन्य तो प्रयाग धन्य ते त्रिवेणी । न्हाती येऊनि गुप्तरूपें ॥ ३ ॥ धन्य ते भूमी धन्य ते प्राणी ।

देखती नयनीं ज्ञानदेवा ॥ ४ ॥ धन्य ते भाग्याचे होती अळंकापूरीं । तयाचा निर्धारीं धन्य वंश ॥ ५ ॥ धन्य दासानुदास अळंकापुरींचा । सेना न्हावी त्याचा रजःकण ॥ ६ ॥

१४१ नामयाच्या नारायणें घेतली आळी । या भूमीचें माहिमान सांगे म्हणे वनमाळी ॥ १ ॥ धन्य धन्य अलंकपूर धन्य धन्य सिद्धेश्वर । धन्य इंद्रायणी तीरीं राज्य करी ज्ञानेश्वर ॥ २ ॥ या भूमीचें वर्णन करूं न शके चतुरानन । महा क्षेत्र पुरातन पातकें नासती स्मरणें ॥ ३ ॥ सेना म्हणे जगजीवन सांगतसे जीवींची खूण । महा दोषा होय दहन ज्ञानदेव दरुशनें ॥ ४ ॥

१४२ नाम हें अमृत भक्तासी दिधलें । ठेवणें ठेविलें होतें गुप्त ॥ १ ॥ प्रत्यक्ष अवतार धरिला अलंकापुरीं । मार्ग तो निर्धारीं दाखविला ॥ २ ॥ कृतयुगामाजी वशिष्ट जाणता । नाम तो घेतां नारदमुनी ॥ ३ ॥ कलियुगामाजीं न घडे साधन । जातील बुडोन महा डोहीं ॥ ४ ॥ रामकृष्ण हरी गोविंद गोपाळा । स्मरा वेळोवेळां सेना म्हणे ॥ ५ ॥

१४३ धन्य महाराज अलंकापुरवासी । साष्टांग तयासी नमन माझें ॥ १ ॥ या ज्ञानदेवाचें नित्य नाम घेती वाचें । उद्धरती त्याचीं सकळ कुळें ॥ २ ॥ इंद्रायणी स्नान करिती प्रदक्षिणा । तुटती यातना सकळ त्याच्या ॥ ३ ॥ सेना म्हणे त्याचें धन्य झालें जिणें । ज्ञानदेव दरुशनें मुक्त होती ॥ ४ ॥

१४४. वाचे उच्चारी जो ज्ञानदेवाशी । तयाच्या सुकृतासी नाहीं पार ॥ १ ॥ पूर्वीचें सुकृत फळासि आलें । वाचें उच्चारिलें ज्ञानदेवा ॥ २ ॥ या आलंकापुरीं आला जन्मासी । पूर्वज तयासी मानिती धन्य ॥ ३ ॥ सेना म्हणे त्यानें उद्धरिलें कुळ । पूर्वज सकळ अशिर्वाद देती ॥ ४ ॥

१४५. येउनी नरदेहासी वाचें उच्चारी ज्ञानेश्वर । तयाचा संसार सुफळ झालागे माये ॥ १ ॥ प्रत्यक्ष परब्रम्ह येऊनि अवतारासी । तारिलें जगासी नाममात्रें ॥ २ ॥ जयाचे आंगणीं पिंपळ सोनियाचा । सिद्ध साधकाचा मेळा तेथें ॥ ३ ॥ तयाचे स्मरणें जळतीं पातकें । सांगत पंढरीनाथ सेना म्हणे ॥ ४ ॥

१४६ विष्णूचा अवतार। सखा माझा ज्ञानेश्वर॥१॥चला जाऊं अळंकापुरा। संतजनाच्या माहेरा ॥२॥ स्नान करितां इंद्रायणी। मुक्ती लागती चरणीं ॥३॥ ज्ञानेश्वराच्या चरणीं। सेना आला लोटांगणीं ॥४॥

१४७. गिरजेप्रती शंकर उपदेशिले। तो गुह्य मंत्र सप्त समुद्रापलीकडे ॥ १ ॥ ऐसें निज गुज साराचेंही सार। उघडें दाविलें साचार ज्ञानदेवें ॥ २ ॥ हें सुखाचें सुख साधन। भक्तिज्ञानाचें अंजन। हेंचि परब्रम्ह जीवाचें जीवन ॥ ३ ॥ हेंचि मुख निज राम मंत्र सार। सुलभ साकार सेना ध्याये निरंतर ॥ ४ ॥

१४८. ज्ञानदेव गुरु ज्ञानदेव तारूं। उतरील पैल पारूं ज्ञानदेव ॥ १ ॥ ज्ञानदेव माता ज्ञानदेव पीता। तोडील भवव्यथा ज्ञानदेव ॥ २ ॥ ज्ञानदेव माझे सोयरे धायरे। जिवलग निर्धारे ज्ञानदेव ॥ ३ ॥ सेना म्हणे माझा ज्ञानदेव निधान। दाविली निजखूण ज्ञानदेव ॥ ४ ॥

१४९. अळंकापुरवासिनी। ज्ञानाबाई मायबहिणी॥१॥ लेकुराची चिंता। वागवावी कृपावंता ॥२॥ मी तो आहे यातीहीन। माझा राखा अभिमान ॥३॥ करूनि विनवणी। सेना लागतो चरणीं ॥४॥

१५०. श्रीज्ञानराजें केला उपकार। मार्ग हा निर्धार दाखविला ॥१॥ विटेवरी उभा वैकुंठनायक। आणि पुंडलिक चंद्रभागा ॥२॥ अविनाश पंढरी भूमीवरी पेंठ। प्रत्यक्ष वैकुंठ दाखाविलें ॥३॥ सेना ह्मणे चला जाऊं तया ठाया। पांडुरंग सखया भेटावया ॥४॥

## सासवडमाहात्म्य

१५१. नामयाचा धरुनि हात। सांगे संवत्सराची मात। विठोजी ह्मणे देई चित्त। ऐक गुह्यार्थ सांगतो ॥१॥ ही पुण्यभूमी पवित्र देखा। याची मूळ आदि पीठिका। सिद्धेश्वर नागेंद्र देखा। पुरातन नांदती ॥२॥ या इंद्रनील पर्वतीं। तप तपिन्नलें अमरपती। आणि सूर्यमुखा वरुती। प्रत्यक्ष मूर्ति श्रीशंकराची ॥३॥ ही स्मशान भूमिका आधीं। येथें सोपान देवा समाधी। पुढें राहिला कैळास-

निधी । सन्मुख वाहे भागीरथी ॥४॥ इची करितां पंचक्रोशी । चुके जन्ममरण चौऱ्यांशी । चारी मुक्ती होती दासी । येउनि चरणासी लागती ॥५॥ तो हा सोपान निधान । याचे करितां नामस्मरण। सेना विनवी कर जोडून ।जाती जळून महादोष ॥६॥

१५२ वाचे सोपान म्हणतां । चुके जन्म मरण चिंता ॥ १ ॥ वस्ती केली कऱ्हे तीरीं । पुढें शोभे त्रिपुरारी ॥ २ ॥ सोपान-देव सोपानदेव । नाहीं भय काळाचें ॥ ३ ॥ सोपन चरणीं ठेउनि माथां । सेना होय विनाविता ॥४॥

१५३ ब्रह्मियाचा अवतार । तो हा सोपान निर्धार ॥ १ ॥ याचें घेतां मुखीं नाम । हरे सकळही श्रम ॥ २ ॥ समाधीपासुनी भा-गीरथी । स्नानालागी नित्य येती ॥ ३ ॥ अष्टोत्तर तीर्थांचा मेळा । नाम कऱ्हाबाई वेल्हाळा ॥ ४ ॥ वैष्णवांमाजी डिंगर । सेना तयाचा किंकर ॥ ५ ॥

१५४. वैकुंठवासिनी कृपावंत माउली । जगा तारावया अळंका-पुरा आली ॥ १ ॥ शिव तो निवृत्ति आदिमाया मुक्ताई । ब्रह्मा तो सोपान विष्णु ज्ञानदेव पाहीं ॥ २ ॥ येउनी प्रतिष्ठानीं पशुवेद बोल-विला । पंडित ब्रह्मज्ञानी यांचा गर्व हरिला ॥ ३ ॥ तप्तीतीरवासी चौदाशें वर्षांचा होता । तयाचा अभिमान गर्व हरी आदिमाता ॥ ४ ॥ वाळितां ब्राह्मणीं स्वर्गींचे पितर आणविले । सेना म्हणे जगीं पूर्ण-ब्रह्म अवतरलें ॥ ५ ॥

## वासुदेव.

१५५. टळोनि गेले प्रहर तीन । काय निजतां झांकोन लोचन । आलें मागावया दान । नका विन्मुख होऊं जाणगा ॥१॥ राम-कृष्ण वासुदेवा । जाणवितों सकळ जिवा । द्या मज दान वासु-देवा । मागुता फेरा नाहीं या गांवा गा ॥२॥ आलों दुरुनी सायास । याल दान मागायास । नका करूं माझी निरास । धर्मसार फळ संसारास गा ॥३॥ एक भाव देवाकारणें । फारसें नलगे देणें घेणें । करा एकचित्त रिघा शरण । हेंचि मागणें तुह्मांकारणें गा ॥४॥ नका पाहू काळ वेळा । दान देई वासुदेवाला । व्हां सावध झोंपेला । सेना न्हावी चरणीं लागला गा ॥ ५ ॥

## गौळणी.

१५६. गोपिका वेल्हाळा । अवघ्या मिळोनी सकळा । चालिल्या यमुना जळा । तंव सन्मुख देखिला सांवळा वो ॥१॥ राधा ह्मणे बहु चाळक होसी । नसतां आळ कां आह्मांवर घेसी । त्वां देखिलें येशोदेसी । हा लवाड लटका ऋषीकेशी वो ॥२॥ यशोदा ह्मणे कवटाळिणी । नसती खोडी कारितां देखुनी । सांगतां गाऱ्हाणें येऊनी । गुणातीत हा चक्रपाणी वो ॥३॥ राधा म्हणे यशोदा सुंदरी । चोरटा शिंदळ तुझा मुरारी । आह्मां ठाऊक अंतरीं । हा न करी तें करी काय सांगूं वो ॥४॥ हा ब्रह्मांडनायक । येणें मोहिले तिन्ही लोक । सेना म्हणे यदुनायक । कर्मातीत परिपूर्ण वो ॥५॥

१५७ दूती जाणवित स्वामिनी । काम दाटला हृदयभुवनीं । कोपा नयेचि सारंगपाणी । सेजे पाहतां न दिसे नयनीं ॥१॥ मज भेटवागे श्रीहरी । लागला वेध त्याचा अंतरीं । ध्यानीं बिंबलागे मुरारी । प्राण रिघो पाहे जरी ॥२॥ गोड न लगे काम धंदा कांहीं । नावरे चीर चोळी पाहीं । सुमनसेज रुपती बाई । चित्त वेधलें हरी पायीं हो ॥३॥ वृत्ति स्वानंदीं निमग्न । गेली देहभाव विसरून । रंगीं रंगली परिपूर्ण । धन्य धन्य सेना म्हणे ॥५॥

१५८. गाय चारी घननीळा । सवें गोपाळांचा मेळा । मोहिलें वेणुनादें सकळां । स्वानंदें गाई नाचती । गोपिका परमानंदें गाती । गोपाळ प्रेमें डुल्लती ॥ १ ॥ भला भला तूं श्रीहरी रे ॥ ध्रु० ॥ वेडे वांकुडे पांगुळे । बोबडे मुके आंधळे । धांवतां पडे अडखळे । हरी म्हणे गोपाळासी । तुम्ही बैसा मजपाशीं । मिळवितों गाईसी ॥ २ ॥ ॥ भला० ॥ नको संगती ऋषीकेशी । आम्हां गाई वळी म्हणसी । आम्हां दुरी दवडीसी । मज ठाऊक अंतरीं । तुज ओळखी खरीच ॥३॥ भला ०॥ गाय पाळुनी दुधाची । आपण सगळेंची खाशी । आह्मां धमकाउनी ठेविसी । काय सांगूं तुझी मात । भेद नाहीं तुह्मां आह्मांत । सेना ह्मणे गोपिनाथ । समाधान कर्तारे ॥४॥ भला०

... पोवा घोंगडी घेउनी पाहीं । संगें गोपाळ घेउनि गाई । ...ाले लवलाही । वेणू वाजविला सुस्वरें बाई हो ॥ १ ॥ ... ल्या गौळणी । वेणुनाद पडियेला कानीं । भोवत्या पाहती

अवलोकुनी । नयना न दिसे सारंगपाणी हो ॥ २ ॥ विसरल्या कामधंदा । सासु सासऱ्याची नाहीं मर्यादा । कोण जाणे त्या कोण जावा नणंदा । वृत्ति वेधली परमानंदा हो ॥ ३ ॥ अवघा हरपला देहभाव । पुसिला जन्ममरणाचा ठाव । वृत्ति स्वानंदें मुराली पहावो। सेना म्हणे भाग्य उदयो हो ॥ ४ ॥

१६०. जाती मिळोनि पांच सात गवळणी । गोरस विकूं मथुरे लागोनी । वाटे आडवोनी दान मागे चक्रपाणी ॥ धृ० ॥ १ ॥ सोडीं सोडी मज जाऊं दे हरी । नको वाटे आडवूं म्हणे मुरारी । घरीं जावा नणंदा जाचिती कीं भारी ॥ २ ॥ म्हणती गवळणी हरिसि हसुनी । देऊं तुज लागीं नवनीत चोरुनी । जाऊं पाहती ठकवूनी हरीसी गवळणी ॥ ३ ॥ ब्रह्मांडाचा नायक म्हणे गोपिकांसी । ब्रह्मज्ञानी महान चाळविले ऋषी । गाई गोपाळ चोरिलें नाडिलें ब्रम्ह्यासीं ॥ ४ ॥ भक्तिभावें गवळणी रिघाल्या शरण । वृत्तिसहित बिंबल्या अवघ्या परिपूर्ण । सेना म्हणे विसरल्या कार्य आठवण॥ ५ ॥

१६१. एक येश्वदे साजणी।या कृष्णाची करणी । दही दूध खातो चोरूनी । टाकी माजणें फोडोनी ॥ धृ० ॥ १ ॥ सांभाळ आपुला हरी गे । उगा न राहे क्षणभरी गे । येणें धमकाविल्या पोरिगे । काय सांगों भांडखोरी गे ॥ २ ॥ करी करणें कळेना गे । हृदयीं धरितो सुना गे । भोग भोगितो शहाणा गे । आंगीं लागूं देईना गे ॥ ३ ॥ हा दिसतो भोळा गे । येउनि घालितो डोळा गे । सावलं करितो गोळा गे । नाहीं काळ वेळा गे ॥ ४ ॥ सावळा जगजेठी गे। चित्त चोर कपटी गे । हा न कळे वेद श्रुती गे । येणें हरली काम वृत्ती गे ॥ ५ ॥ हें बाळक नंदाचें । भाग्य फळलें गवळ्यांचें । सेना म्हणे धन्य साचें । पुण्य त्या गोपींचें ॥ ६ ॥

१६२. राधा जाणवित दूती । कामें व्यापिलें न गमे राती । कां बा गोवळा नये निश्चिती । यानें वेधली चित्तवृत्ती ॥धृ०॥ मज दाखवागे हरिसी । ध्यान लागलें मानसीं । त्याविण न गमे दिवस निशीं । डोळा ऋषीकेशी दावा मज ॥२॥ मिळोनि गोपींनीं मोहिला। कीं सत्यभामेनें दान केला । नारद हरिसी घेउनि गेला । नेणो गुंतला सदैवा घरीं ॥३॥ धाडिलें गरुडासी । वेगीं आणावें हनुमंतासी।

अभिमान होता सत्यभामेसी । नेउनिया सभेसी विटंबिली ॥४॥ माया लाघवी सूत्रधारी । बोलतां बोल खुंटला वैखरी । धरिला गोपिकांनीं अंतरीं । सेना म्हणे धन्य त्या नारी हो ॥५॥

१६३. कृष्ण आला ऐकुनि गोपिका सुंदरी । विव्हळ झाल्या पहावया हरी । एकी त्या धांवल्या नगरा बाहेरी । कायावाचा मनें वेधल्या नारी ॥ ध्रु० ॥ १ ॥ आनंदल्या गवळणी हरी आला मथुरेसी । मोहियलें मन देखोनी रूपासी । झाली उतावीळ पहावया ऋषीकेशी । नेत्रिचें काजळ लाविलें मुखासी ॥ २ ॥ एक ती बैसली होती पति शेजारीं । नग्नाचि धांवत आली बाहेरी । विसरुनि चीर ठेवी माथियावरी । देहभाव हरपला देखोनि मुरारी ॥ ३ ॥ एकी त्या ताटक घातलें पायीं । विरुद्या जोडवीं कंठाचे ठाईं । घेउनी पोल्हार खोविलें डोईं । वाळ्या वाक्या बांधिल्या कानाचे ठाईं ॥ ४॥ एकीनें कडिये घेतली दह्याची माथण । बाळक ठेविलें शिंकीया जाण । नाहीं पुत्रलोभ देखोनि कृष्ण । निजसुखा मीनली नाहीं आठवण ॥ ५ ॥ करितां मंथन हरि आला ऐकुनि कानीं । तैशीच धांवली रवी दोर घेउनी । नाकींचें मुक्ताफळ खोविलें वेणीं । मोतियाची जाळी घाली गुडघ्या लागुनी ॥ ६ ॥ कृष्णसुखा मीनल्या अवघ्या सुंदरी । लाज भय मोह शंका दवडिल्या दुरी । सेना म्हणे वृत्ति झाली तदाकारी । परतुनि संसारा नुरेचि उरी ॥ ७ ॥

१६४. सोडिल्या शिदोरी । काला करी दही मात ॥ १ ॥ घ्यारे अवघे समस्त । हरी गोपाळांसि देत ॥ २ ॥ कांहीं न ठेवा उरी । आजी देतों पोटभरी ॥ ३ ॥ सेना बैसला द्वारीं । प्रसाद वाटितो श्रीहरी ॥ ४ ॥

१६५. श्रीगुरुनिवृत्तिराय सांप्रदाय दाविला । अलंकापुरवासिनी अधिकार तया दिधला ॥ १ ॥ आदिनाथें मुळ गुप्त होतें ठेविलें । निवृत्तिकृपेनें ज्ञानदेवें प्रगट केलें ॥ २ ॥ बुडतां भवसागरीं जगा काढिलें बाहेरी । दावियेला तारु विठ्ठल या तीं अक्षरीं ॥ ३ ॥ विटेवरी उभा नीट वैकुंठीचा राणा । दावियली खूण म्हणे न्हावीयाचा सेना ॥ ४ ॥

# नरसी मेहेता.

१. माता आगळ मोहन नाचे । आंग लीये हरि वलग्यारे । वदन सकोमल नीरखे जननी । क्षण न मेले अळगारे ॥ माता० ॥ध्रु०॥ मंदिरमाथी मोदिक लावी । माता सुख मेलतीरे । नाशी जाये आघो आवे । वाही वात करतीरे ॥ माता० ॥१॥ एम करी जुवती जन आव्या । राव कुवरनी कर वारे । नरसीयानो स्वामी नथन नचावे । माननीना मन हरवारे ॥ माता० ॥२॥

२. जाग्यने जादवा कृष्ण गोवालिया । तुमविना ध्यानमा कुण जाशे । त्रणसेनेसाठ गोवाळ टोळे मळ्या । वडोरे गोवालियो कुण थाशे ॥ध्रु०॥दहितपणा दई थरां घीतणा घेवरा । कढीयल दूध ते कुण पशे । हरि तारयो हाथियो कालिनाग नाथीयो । भुमीनो भार ते कोण लेशे ॥ जा० ॥१॥ जमुनाने तीरे गौधण चरावतां । मधुरिसी मोरली कुण वासे । भणे नरसीयो तारागुण गाई रिझिये । बुडता बाहेडी कुण शाहसे ॥ जाग्यने० ॥२॥

३. हळवे हळवे हरजी । मारे मंदिर आव्यारे । मोटे मोटे मोतीडे। मेतो वधाव्यारे ॥ध्रु०॥ कीधुं कीधुं कीधुं मुजने कांईक कामण कीधुंरे । लिधुं लिधुं लिधुं मारूं चितडूं चोरी लिधुंरे ॥ हळवे०॥१॥ जागी जागी जागी हूं तो । हरीमुख जोवा जागीरे । भागी भागी भागी मारा । भवनी भांवठ भागीरे ॥ हळ० ॥२॥ फुली फुली फुली हुं तो । हरिमुख जोईने फुलीरे । भूली भूली भूली मारा । घरनो धंदो भूलीरे ॥३॥ पामी पामी पामी हुं तो । महापद्वीने पामीरे । मळीयो मळीयो मळीयो मेहता। नरसीयानो स्वामीरे ॥हळवे०॥३॥

४. एक घडी दिन उग्या पेहेला । जो जिव्हा मुख राम कहे। राम कहे मुख कृष्णज केहवुं । पाप बापडो त्यां न रहे ॥ध्रु०॥ केशरी गाजे जेम मृगलों नाशे, रवि उगतां तिमीर टळे । मेरू थकी मोहोटेरा पातक । लई लक्ष्मीवर दूर करे ॥ एक ॥१॥ रामनामनो महिमा मोहोटो । शिव सनकादिक ध्यान धरे । पुरण ब्रह्म अखंड अविनाशी । त्रिविधीना तापने दूर करे ॥ एक० ॥२॥ ए

पद तो सुख देवजोये सेव्यां । ध्रु अंबरिष तेनुं ध्यान धरे । अजामेल अपराधी पापी । नारायणके नाम तरे ॥ एक० ॥३॥ नाम निरमलने भक्ति अविचळ । ऋषि मुनि तेनुं ध्यान धरे । नरसांयाना स्वामीने भजी ले । कोटि जन्मना पाप टले ॥ एक० ॥४॥

५. यदुपति नाथ ते मित्र छे तमतणा । जावो वेगे करी श्रीकृष्ण पासे । प्रित पूरव तणीहेते धरशे हरि । मनना मनोरथ सफळ थाशे ॥ यदु० ॥ धृ० ॥ घेर बाळक सहुदुःख पामे बहु । अन्नने वस्त्रथी रहे छे उणा । निरधन सराजिया ते पुन्य किधाविना । कर्मना दोष ते आवी पुण्या । यदु० ॥१॥ यदुपति जादवो भक्तवस माधवो । करशे करुणा प्रभु दिन जाणी । गोमति स्नानथि कोटि अघ नाससे । निरखतां कृष्णने प्रेम आणी ॥ यदु० ॥२॥ कृष्णने हलि मलि सीघ्र आवो फरी । जाणसे दुःख अंतरयामी । विनती मनमां धरो आलस परहरी । साहाय थाशे नरसीयानो स्वामी ॥ यदु० ॥३॥

६. उठ उतावळो चाल्यने विठ्ठला । गोविंद गायने वच्छ धावे। जाग्यने जादवा जननी जसोदा वदे । कान कांधणी तने निद्रा आवे ॥ उठ० ॥ ध्रु० ॥ दंत धावन करो आळस परहरो । रजनी तिमर गयूं पहोर फाट्युं । कुरने करमलो शेन शिरावतो । दहिरे दामोदरा थाट खाट्टं ॥ उ० ॥१॥ बारणा बहार बळिभद्र उभा रह्या । जोरेवाला तारी वाट जुवे । नरसीयाना स्वामीनु मुखडूं दिठडे । मातनूं मनडूं अतिरे मोहे ॥ उठ० ॥२॥

७. श्रीकृष्ण कीर्तन विना नरसदा सूतकी विमल किधे न वपु सुहथाये । सकल जे तीर्थ ते कृष्ण । किर्तनकथा हरितण दासज्या हेते गाये ॥ ध्रु० ॥ पूर्ण पुरुषोत्तम नवल रंगी तजी अन्य देवें जेनूं मन मोह्युं । कोटी चिंतामणि कामधेनु तजी भेंसना पुत्रनुं दुघ दोह्युं ॥ श्री० ॥१॥ गर्ग जोशी ते जस गाय जेनो सदा । नारद नाम मुखथी नमूके । तेज श्रीकृष्ण आवीने उभा रह्या । गोपिका कृष्ण जोवा न चूके ॥ श्री० ॥२॥ जगद्गुरु कृष्ण जन विमुख पेसे नहीं । नेति नेति कही नीगम नामे । नरसीयो रंक जश गाई हरी रिझावे । शेष नहीं सहस्रमुख पार पामे ॥ श्री० ॥३॥

८. रात रहे जाहरे पाछली खट घडी । साधु जनने कदि सुई न रेहेवूं निद्राने परहरी । समरवा श्रीहरी । एक तूं एक तूं एम केहेवूं ॥ ध्रु० ॥ जोगीया होय तेने जोग संभाळवा । भोगिया होय तेने भोग तजवा । बेदिया होय तेने बेद विचारवा । वैष्णव होय तेने कृष्ण भजवा ॥१॥ सुकवि होय तेने ग्रंथ सदा बंधवा । दातार होय तेने दान करवूं । पतिव्रता नारिये कंथने पूछवूं । कंथ कहे तेज चित्तमांहि धरवूं ॥ रा० ॥२॥ आपणे आपणा धर्म संभाळवा । कर्मनो मर्म लेवो विचारी । नरसीना स्वामीने स्नेहथी समरतां । फरि नहीं अवतरे नखे नारी ॥ रा० ॥३॥

९. हरी रही रटण कर कठण कळी काळमां । दाम बेसे नहीं काम सरसे । भक्त आधिन छे स्यामसुंदर सदा । ते तारा कारज सिद्ध करशे ॥ हरी ॥ धृ० ॥ अल्प सुख सारूं मूढ शुं फुल्यो फरे । शिस पर काळ रहयो दंत करडे । पामर पलकनी खबर तुजने नहीं मूढ शूं जोइने मछ मरडे ॥ हरी० ॥१॥ परोढ पापे करी बुधी पाछी फरी । परहरी थड शुं डाले वलग्यो । ईशने ईर्शा छे नहीं जीवपर । आपणे अवगुण रहयो अळगो ॥ हरी० ॥२॥ प्रपंच परहरो सार हृदियें धरो । उच्चरो हरी मुखें अचलवाणी । नरसीया हरीतणी भक्ति भूलीशमां । भक्तिविना चिजु धुळधाणी ॥ हरी० ३॥

१०. नंदना नंदसु नेह जेहने नहीं तेरे मानव खर स्वान तोले । भूतल भार करवाने ये अवतरया । प्रेतनी पेरे संसार डोळे नंद ॥ ध्रु० ॥ दृष्टि थकी टळो भोग तेना बळो शैल्य पडो तेना मुख माथे । जिवता जन ते तो जम जेवा जाणवा । प्रिय नहि जेने कृष्ण साथे ॥१॥ किरती श्रीकृष्णनी जिभथी नव भणे । तेरे मुखे देवराव ताळू । भणे नरसीया जेणें हरिने जाण्या नहीं । तेहनु कूटूंब सदा काळूं ॥२॥

११. तारा दासना चरणनी रेण मस्तक धरूं । जेथकी कोटि कल्याण पामूं । निरखितां नेत्रसूं नेत्र अमृत ठरे । भवतणू पाप ते वलण वामूं ॥ तारा० ॥१॥ भक्तने भेटतां किलमिष न रहे । ज्ञान-दीपक थकी तिमीर नासे । धन्य धन्य भाग्य जे साधु संगत करे ।

कृष्ण कीरतन थकी कृष्ण भासे ॥ तारा० ॥२॥ एक क्षणवार जे संत संगत करे धन्य घडी जंतुनी तेज जाणे । भणे नरसींयो भव-सागर बुडतां । हरिजन नाव निश्चे प्रमाणे ॥ तारा० ॥३॥

१२. साधु साचे भजो चरण गोविंदना । मानवी देह ते तत्व कहिये । कृष्ण कहो वाळि वाळि कृष्ण कहो कृष्ण कहेता सऊ सुख लहिये ॥ साधु० ॥ध्रु० ॥ कृष्ण सेवा तणी अमर इच्छा करे । मूढ मति मानवी काई न जाणे । कृष्णनु नाम रखे हृदयथी विसरे। धन्य मा धन्य कृष्णज प्रमाणे ॥१॥साधु०॥ जेने जोवो महामुनि जनवन भमे विठ्ठलो वनमा गायो चारो । भणे नरसींयो जे चतुर नर ते खरो । अहर्निश कृष्ण श्रीकृष्ण धारे ॥ साधु० ॥२॥

१३. भोगल भागिये राय दामोदरा । उठ जदुनाथ देवाधि देवा। राय मंडलिक मद भरयो एम ओचरे । नरसींया नागरनी सांची सेवा ॥ भोग०॥१॥ भक्तपालक दयाल दामोदरा । दास नर सैने शरणे राखो । पतित छे मूजने पूरणता हरी । नागर साथे हरि नेह दाखो ॥भोग०॥२॥ निसदिन नरहरि नाम हृदयिं वसो । पतित-पावन तारूं बरद कहावे । ग्राह्या थकी तमे गज मुकावियो। तेम नर सीया नागरने मुकाव्यो ॥ भोग० ॥३॥

१४. श्रीकृष्ण कृपानिधी केशवा श्रीहरी । हूं अनाथ तूं नाथ कहिये । मंडालिक हारने पेरे पेरे परभवे । छबिला विणा शर्ण कोने जईये ॥ श्री०॥१॥ संसार परहरी नाम तारूं जपूं । तो प्रभु कांपेरे पेरे पीडे । अंतरगत अविलोकन शामला। तुजविना हृदियाशुं कोण भिडे ॥ श्रीकृष्ण० ॥ २ ॥ माहारा मनमां हरख पूरण छे । तो मारूं दुःख प्रभुसे न जाणे । भणे नरसींयो पूरण पतित माहरे । मंडालिक मूजने मारे वाणे ॥ श्रीकृष्ण० ॥३॥

१५. उठरे अटपटा नथी बोलतो चटपटा । लंपटा लाज तारी के जाशे । वज्रपति रंगमा केल घणा करे । तुजविना वारे ते कुण धाशे ॥ उठ० ॥१॥ उठ तू चरवडी सुं बेठो हरवडी वात गाढी पढी भूज साथे । भक्तवत्सल कहावे ते फोगट गयुं । लाज सेवकनी तूज हाथे ॥ उठ०॥२॥ जीव मारो जगमगे । अंग मारूं फगमगे ।

